**असंघटित कामगारांची ई-श्रम पोर्टलवरील नोंदणी प्रक्रिया गतिमान करुन सदर प्रक्रिया दि.३१.१२.२०२१ पर्यंत पूर्ण करण्याच्या उद्देशाने राज्यस्तरीय संनियंत्रण समिती व जिल्हास्तरीय अंमलबजावणी समिती गठित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र :- असंका ११२१/प्र.क्र.९७/काम-७अ**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक:- १२ नोव्हेंबर, २०२१**

**संदर्भ :-** श्रम एव रोजगार मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. D.O.No.M-१६०११/०१/२०१९-SS-III दिनांक:- १३ ऑगस्ट २०२१ चे पत्र

**प्रस्तावना :-**

Suo Motu Writ Petition (Civil) क्र.६/२०२० मध्ये मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.२९.६.२०२१ रोजी केंद्र शासनास सर्व संबंधित राज्ये व केंद्र शासित प्रदेशांना NDUW Project (National Data base for Unorganised Workers) करिता पोर्टल उपलब्ध करुन दि.३१.१२.२०२१ पर्यत स्थलांतरीत कामगार व असंघटित कामगारांची नोंदणी पूर्ण करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार केंद्र शासनाने ई-श्रम पोर्टल तयार केले आहे. सदर पोर्टलवर देशातील असंघटीत कामगारांना नोंदणीची सोय उपलब्ध करुन देण्यात आली आहे. या पोर्टलवर कामगार स्वत: नोंदणी करु शकतात अथवा Common Service Center च्या माध्यमातून नोंदणी करु शकतात. संदर्भाधीन पत्रान्वये केंद्र शासनाने असंघटीत कामगारांची नोंदणी प्रक्रिया विहीत मुदतीत पूर्ण करण्याकरिता मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय संनियत्रण समिती व जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय अंमलबजावणी समिती स्थापन करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार राज्यस्तरीय संनियत्रण समिती व जिल्हास्तरीय अंमलबजावणी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने विकसित केलेल्या ई-श्रम पोर्टलवर असंघटित कामगारांची नोंदणी प्रक्रिया दि.३१.१२.२०२१ पर्यंत पूर्ण करण्यासाठी सदर नोंदणी प्रक्रियेचे संनियंत्रण व अंमलबजावणी करण्याकरिता मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय संनियंत्रण समिती व जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात येत आहे. या समित्यांची रचना व कार्ये खालीलप्रमाणे राहतील-

## <u>राज्यस्तरीय संनियंत्रण समितीची रचना-</u>

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | - अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (कामगार) | - सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, गृहनिर्माण विभाग | - सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (उद्योग) | - सदस्य |
| ५ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, ग्रामविकास विभाग, | - सदस्य |
| ६ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, शालेय शिक्षण विभाग | - सदस्य |
| ७ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | - सदस्य |
| ८ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | - सदस्य |
| ९ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,माहिती तंत्रज्ञान विभाग (डिजीटल इंडिया/नागरी सुविधा केंद्र) | - सदस्य |
| १० | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, कृषी, पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्य व्यवसाय विभाग(कृषी) | - सदस्य |
| ११ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नगरविकास विभाग | - सदस्य |
| १२ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,महिला व बालविकास विभाग | - सदस्य |
| १३ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, कृषी, पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्य व्यवसाय विभाग (मत्स्य व्यवसाय) | - सदस्य |
| १४ | संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय | - सदस्य |
| १५ | कामगार आयुक्त | - सदस्य |
| १६ | विकास आयुक्त (अ.का.) | - सदस्य सचिव |
| १७ | कल्याण आयुक्त (केंद्र शासनाच्या श्रम व रोजगार मंत्रालयाने नामनिर्देशित केलेला) | - सदस्य |
| १८ | राज्य समन्वयक, नागरी सुविधा केंद्र (CSC) | - सदस्य |

| | | |
|---|---|---|
| १९ | खालील राज्यस्तरीय संघटना/युनियन/महासंघ यांचे अध्यक्ष/सचिव<br>a) असंघटित कामगार,b) इमारत व इतर बांधकाम कामगार,c) स्वयंसहाय्यता गट (राष्ट्रीय शहरी आजीवीका मिशन (NULM) व राष्ट्रीय ग्रामीण आजीवीका मिशन (NRLM)),d) घरेलू कामगार, e) आशा वर्कर्स,f) अंगणवाडी वर्कर्स, g) फेरीवाले, h) रिक्षाचालक, i) विटभट्टी कामगार, j) शेतमजूर, k) मनरेगा मजूर, l) मासेमारी आणि तत्सम काम करणारे m) राज्यस्तरीय संघटना/ युनियन (दुकानदार/ लघुव्यापारी) या संघटनांच्या प्रतिनिधींपैकी मा. मुख्य सचिव यांनी निश्चित केलेले एकूण दोन प्रतिनिधी | - सदस्य |

<u>**राज्यस्तरीय संनियंत्रण समितीची कार्ये खालीलप्रमाणे असतील-**</u>

१) जिल्हाधिकारी/जिल्हादंडाधिकारी स्तरावरील जिल्हानिहाय असंघटित कामगारांच्या नोंदणीबाबत प्रगतीचे परिक्षण व नियंत्रण करणे.

२) क्षेत्रीय स्तरावरील नागरी सुविधा केंद्रे व राज्यसेवा केंद्राच्या कामकाजावर नियंत्रण ठेवणे व असंघटित कामगारांच्या नोंदणीचे उद्दिष्ट (targets) पूर्ण होण्यासाठी प्रयत्न करणे.

३) मनरेगा मजूर, स्वयंसहाय्यता गट (राष्ट्रीय शहरी आजीवीका मिशन-NULM व राष्ट्रीय ग्रामीण आजीवीका मिशन-NRLM), फेरीवाले, रिक्षा चालक, इमारत व इतर बांधकाम कामगार, मध्यान्ह भोजन वर्कर्स, घरेलू कामगार, आशा वर्कर्स , अंगणवाडी वर्कर्स, शेतमजूर, मच्छिमार, विटभट्टी कामगार यासारख्या असंघटित कामगारांची “ई-श्रम” पोर्टलवर नोंदणी करण्यासाठी संदर्भित विभागांद्वारे (Line Departments) जिल्हानिहाय निश्चित केलेले उद्दिष्ट (targets) पूर्ण होण्यावर भर देणे व त्यासंदर्भातील कामाच्या प्रगतीवर नियंत्रण ठेवणे.

४) बांधकाम कामगार / आशा वर्कर्स/ अंगणवाडी वर्कर्स/ मनरेगा मजूर/ घरेलू कामगार/ मध्यान्ह भोजन कामगार/ मच्छिमार कामगार या कामगारांच्या मोठ्या गटांच्या ई- श्रम पोर्टलवरील नोंदणीच्या प्रगतीवर नियंत्रण ठेवणे.

५) असंघटित कामगारांच्या कल्याणासाठी काम करणा-या कामगार संघटना / महासंघ/ नागरी समाज संघटनांना ई-श्रम पोर्टल अंतर्गत नोंदणी करण्यासाठी त्यांच्या संबंधित सदस्यांना ई- श्रम पोर्टलवरील नोंदणीचे महत्व पटवून देणे.

६) असंघटित कामगारांकरीता नागरी सुविधा केंद्र व जिल्हा स्तरावर नियमित नोंदणी शिबिरांचे आयोजन सुनिश्चित करणे.

७) ई- श्रम च्या संभाव्य लाभार्थांची माहिती, शिक्षण आणि संवाद साधण्याची रणनिती आणि त्या रणनितीची अंमलबजावणी राज्य कामगार विभाग आणि इतर अधिकृत यंत्रणेद्वारे करण्यात येईल.

८) चर्चासत्र, सेमिनार, सार्वजनिक सभा, विद्यार्थ्यांचा सहभाग, विद्यापीठे, महाविद्यालये, मिडिया चॅनेल, बातम्या, मोहिमा, पत्रके, पोस्टर्स, धोरणात्मक ठिकाणे/ कामगार एकाग्रतेची इतर प्रमुख ठिकाणे याद्वारे राज्यव्यापी जागरुकता कार्यक्रमांच्या अंमलबजावणी आखणी आणि प्रगतीचे नियंत्रण करणे.

**९)** समितीची तीन महिन्यातून किमान एकदा बैठक घेणे.

**जिल्हास्तरीय अंमलबजावणी समिती-**

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी | - अध्यक्ष |
| २ | जिल्हापरिषदचे मुख्य कार्यकारी अधिकारी | - सदस्य |
| ३ | महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपरिषद यांचे आयुक्त/ मुख्याधिकारी/ कार्यकारी अधिकारी | - सदस्य |
| ४ | सहायक कामगार आयुक्त/ जिल्हा कामगार अधिकारी | - सदस्य सचिव |
| ५ | जिल्हा समन्वयक, नागरी सुविधा केंद्रे (CSC) | - सदस्य |
| ६ | राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्राचे जिल्हास्तरीय अधिकारी (NIC) | - सदस्य |
| ७ | सर्व गटविकास अधिकारी | - सदस्य |
| ८ | संदर्भिय विभागाचे (Line Department) जिल्हास्तरीय अधिकारी (उदा. मुख्य वैद्यकिय आणि आरोग्य अधिकारी, महाव्यवस्थापक-जिल्हा आरोग्य केंद्र,समाज कल्याण अधिकारी/ महिला व बालविकास अधिकारी/माहिती व जनसंपर्क अधिकारी/शिक्षण अधिकारी / कृषी अधिकारी/ मत्स्य पालन अधिकारी/ NHM/ SSA/ SRLM/ SULM) | - सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ९ | खालील जिल्हास्तरीय संघटना / असोशिएशनचे अध्यक्ष / सचिव-<br><br>a) असंघटित कामगार b) बांधकाम कामगार c) SHG (NULM आणि NRLM अंतर्गत) सदस्य d) घरेलू कामगार e) आशा कामगार f) अंगणवाडी कर्मचारी g) फेरीवाले h) रिक्षाचालक i) वीटभट्टी कामगार j) शेतमजूर k) मनरेगा मजूर l) मच्छीमार आणि तत्सम काम करणारे या कामगार संघटनांचे जिल्हाधिकारी यांनी निश्चित केलेले दोन प्रतिनिधी | - सदस्य |

**<u>जिल्हास्तरीय अंमलबजावणी समितीची कार्ये खालीलप्रमाणे असतील-</u>**

१) जिल्ह्यातील असंघटीत कामगारांच्या नोंदणीसाठी निश्चित केलेल्या उद्दिष्टांच्या (targets) अनुषंगाने असंघटित कामगारांच्या नोंदणीच्या प्रगतीचा आढावा घेणे.

२) असंघटित कामगारांचे ईश्रम पोर्टलवरील- नोंदणीचे उद्दिष्ट पूर्ण होण्याच्या दृष्टीने जिल्ह्यातील नागरी सुविधा केंद्र व राज्य सेवा केंद्राच्या कामकाजाचा आढावा घेणे व नियंत्रण ठेवणे.

३) जिल्ह्यातील संबंधित विभागातील (Line Department)मनरेगा मजूर, स्वयंसहाय्यता गट (NRLM व NULM), फेरीवाले, रिक्षा चालक, इमारत व इतर बांधकाम कामगार, मध्यान्ह भोजन वर्कर्स, घरेलू कामगार, आशा वर्कर्स, अंगणवाडी वर्कर्स, शेतमजूर, मासेमारी करणारे आणि विटभट्टी या सारख्या असंघटित कामगारांच्या गटांचे ई-श्रम वरील नोंदणीच्या कामाचे उद्दिष्ट पूर्ण करणे.

४) असंघटित कामगारांकरीता काम करणा-या कामगार युनियन्स/ कामगार संघटना/ फेडरेशन/ नागरी संस्था/ अशासकीय संस्थाच्या मार्फत ईश्रम पोर्टल-वर संभाव्य लाभार्थ्यांच्या नोंदणीकरीता प्रयत्न करणे.

५) असंघटित कामगारांकरिता जिल्हास्तरीय व नागरी सुविधा केंद्र स्तरावर नोंदणी कार्यशाळा नियमितपणे कार्यान्वीत करणे.

६) इमारत व इतर बांधकाम कामगार/ आशा वर्कर्स/ अंगणवाडी वर्कर्स/ मनरेगा मजूर / घरेलू कामगार/ मध्यान्ह भोजन मजूर आणि मासेमारी करणारे कामगार यांच्या मोठ्या प्रमाणावरील नोंदणीवर नियंत्रण ठेवणे.

७) ई-श्रमवरील संभाव्य लाभार्थ्यांसाठी माहिती, शिक्षण व संवाद साधण्यासाठी मोहिम राबविणे.

८) कामगार नाका, विटभट्टी, बांधकामाची मजुरीची ठिकाणे/ मासेमारीची ठिकाणे, दुग्ध उद्योगाचे केंद्र इ. ठिकाणी विशिष्ट गटांची नोंदणी करण्यासाठी नागरी सुविधा केंद्र/ राज्य सेवा केंद्राच्या फिरत्या व्हॅनची व्यवस्था करणे.

९) चर्चासत्र, सेमिनार, सार्वजनिक सभा, विद्यार्थ्यांचा सहभाग, विद्यापिठे, महाविद्यालये, प्रसारमध्यमे वाहिन्या, वृत्तपत्र कार्यशाळा, पत्रके, पोस्टर्स, बॅनर, जिल्हा कामगार कार्यालये/ कौशल्यविकास केंद्र / महत्वाचे ठिकाण/ कामगार एकत्रित येत असलेल्या ठिकाणांवर जिल्हास्तरावर मदत केंद्रे ,जनजागृती कार्यक्रमांची अंमलबजावणी करणे व त्यांचे परिक्षण करणे.

१०) समितीच्या निदर्शनास आलेल्या तक्रारींचे निवारण करणे.

११) समितीची एका महिन्यात किमान एक बैठक घेणे.

२. राज्यस्तरावर तसेच जिल्हास्तरावर स्थापन करण्यात येणा-या समित्यांनी बैठक घेतल्यानंतर केलेल्या कार्यवाहीच्या प्रगतीचा अहवाल शासनास (कामगार विभाग) सादर करावा.

३. सदर समित्यांमधील अशासकीय संस्थांच्या संघटनांच्या प्रतिनिधींना मानधन, प्रवास भत्ता, इत्यादी देय असणार नाहीत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२१११५१८१०३०१५१० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Dadasaheb Sopan Khatal
Date: 2021.11.15 18:20:00 +05'30'

**(दा. सो. खताळ)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव (पत्राने),

२) मा. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,

३) अपर मुख्य सचिव (महसुल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,

४) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

६) अपर मुख्य सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,

७) अपर मुख्य सचिव, (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) अपर मुख्य सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) प्रधान सचिव (२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) प्रधान सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय मुंबई,
१४) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) प्रधान सचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८) कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा - कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पुर्व), मुंबई-५१
१९) विकास आयुक्त (असंघटित कामगार), कामगार भवन, बांद्रा- कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पुर्व), मुंबई-५१
२०) सर्व उपायुक्त, महानगरपालिका,
२१) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी,
२२) सर्व जिल्हा उद्योग अधिकारी,
२३) सर्व सह कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा- कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पुर्व), मुंबई-५१,
२४) सर्व कामगार उपआयुक्त, कामगार भवन, बांद्रा- कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पुर्व) मुंबई-५१.
२५) सर्व उद्योग अधिकारी
२६) सर्व जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था
२७) सर्व सह / उपसचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२८) सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२९) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३०) निवडनस्ती कार्यासन कामगार -७अ.